## महाराष्ट्र शासन

<u>तत्काळ</u>

क्र.प्रतिनि २५१९/प्र.क्र.१६२/१४-अ,
सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मुंबई ४०० ०३२.
दूरध्वनी क्र.२२७९४१७२/२२७९३३४४
दिनांक : ०४ नोव्हेंबर, २०१९

प्रति,

सह/उप सचिव (आस्थापना),
सर्व मंत्रालयीन विभाग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

**विषय** :- राज्य माहिती आयोगाच्या कोकण खंडपीठ कार्यालयातील रिक्त होणारे पद प्रतिनियुक्तीने भरण्याबाबत

**संदर्भ-:**
१) सा.प्र.वि. शा.नि. क्र.एसआरव्ही-२०११/प्र.क्र.१३७/का. १२, दिनांक १७-१२-२०१६
२) सा.प्र.वि. शा.नि. क्र.संकीर्ण-२०१७/प्र.क्र.१२०/कार्या-१४, दिनांक ३१-०८-२०१७.
३) राज्य माहिती आयोग, कोकण खंडपीठ, नवी मुंबई यांचे क्र रामाआ-२०१६/प्र.क्र.१४/आस्थापना दिनांक १७-१०-२०१९ चे पत्र

महोदय/महोदया,

संदर्भाधिन क्र. १ येथील दिनांक १७-१२-२०१६ च्या शासन निर्णयान्वये प्रतिनियुक्तीचे धोरण निश्चित करण्यात आले असून, संदर्भाधिन क्र.२ येथील दिनांक ३१-८-२०१७ च्या शासन निर्णयान्वये मंत्रालयीन संवर्गातील अधिकारी/कर्मचारी यांच्या प्रतिनियुक्तीबाबत कार्यपध्दती विहित करण्यात आली आहे. संदर्भाधिन क्र.३ येथील दिनांक १७-१०-२०१९ च्या पत्रान्वये राज्य माहिती आयोग, कोकण खंडपीठ कार्यालयातील प्रतिनियुक्तीचा कालावधी पुर्ण झालेल्या १ सहायक कक्ष अधिकाऱ्याची सेवा त्याच्या मूळ विभागास प्रत्यावर्तीत करण्यात आल्यामुळे राज्य माहिती आयोग, कोकण खंडपीठ कार्यालयात रिक्त झालेल्या १ सहायक कक्ष अधिकाऱ्यांचे पद प्रतिनियुक्तीने भरण्यासाठी विनंती करण्यात आलेली आहे.

२. राज्य माहिती आयोग, कोकण खंडपीठ कार्यालयातील रिक्त झालेल्या १ सहायक कक्ष अधिकाऱ्यांचे पद प्रतिनियुक्तीने भरण्यासाठी मंत्रालयीन विभागातील सहायक कक्ष अधिकारी या संवर्गातील कर्मचाऱ्यांकडून इच्छुकता मागविण्यात येत आहे. मंत्रालयीन विभागातील इच्छुकता दर्शविलेल्या व विभागांनी प्रतिनियुक्तीस सहमती दिलेल्या कर्मचाऱ्यांची प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यासाठी सदरहू संवर्गातील मंत्रालयीन विभागातील कर्मचाऱ्यांकडून इच्छुकता मागविण्यात येत आहे :-

| पदाचे नांव | राज्य माहिती आयोग, कोकण खंडपीठातील सेवा प्रत्यावर्तीत केल्यानंतर रिक्त झालेल्या सहायक कक्ष अधिकाऱ्यांची संख्या | प्रतिनियुक्तीच्या ठिकाणावरील कार्यालयीन पत्ता |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| सहायक कक्ष अधिकारी | १ | राज्य माहिती आयोग, कोकण खंडपीठ यांचे कार्यालय, सी.बी.डी.बेलापूर, नवी मुंबई -४००६१४ |
| एकूण रिक्त पद | १ | |

३. उपरोक्त पदावर प्रतिनियुक्तीने जाण्याकरिता इच्छुक मंत्रालयीन विभागातील, सहायक कक्ष अधिकाऱ्यांनी आपल्या मंत्रालयीन प्रशासकीय विभागाकडे अर्ज सादर करावा कोणत्याही परिस्थितीत या विभागाकडे थेट अर्ज करु नयेत. थेट प्राप्त झालेल्या अर्जावर कोणतीही कार्यवाही करण्यात येणार नाही. **सामान्य प्रशासन विभाग, शा.नि.**

**दिनांक १७.१२.२०१६ च्या शासन निर्णयातील परिच्छेद ५ (अ) (८) मध्ये नमूद केल्यानुसार नियमित नियुक्ती पासून किमान ७ वर्षे सेवा कालावधी पूर्ण करत नाहीत, अशा कर्मचाऱ्यांची या विभागाकडे शिफारस करण्यात येऊ नये.**

४. सर्व संबंधित मंत्रालयीन प्रशासकीय विभागांनी इच्छुक कर्मचाऱ्यांचे अर्ज प्राप्त झाल्यानंतर संदर्भाधिन शासन निर्णयातील तरतूदीनुसार अर्जांची छाननी करुन खालील माहितीसह आपल्या विभागाच्या सचिवांच्या मान्यतेने इच्छुक कर्मचाऱ्यांचा प्रतिनियुक्तीचा प्रस्ताव खालील माहितीसह या कार्यासनाकडे दिनांक **१९-११-२०१९** पर्यंत पोहोचतील अशारीतीने (नोंदणी शाखेत पाठवू नये) पाठवावा :-

| | | |
|---|---|---|
| १) | कर्मचाऱ्याचे संपूर्ण नांव व पदनाम | |
| २) | जन्मदिनांक | |
| ३) | प्रथम नियुक्तीचा दिनांक | |
| ४) | सेवानिवृत्तीचा दिनांक (पहा शा.नि.दिनांक १७-१२-२०१६ मधील तरतुद ५ (ब) (६) | |
| ५) | शैक्षणिक अर्हता | |
| ६) | भ्रमणध्वनी क्रमांक | |
| ७) | मागील ३ वर्षाच्या गोपनीय अहवालाच्या छायाप्रती (मूळ गोपनीय अहवाल पाठवू नयेत) | |
| ८) | मत्ता व दायित्व सादर केली आहेत का? (दि.३१.३.२०१७ रोजीचे) | |
| ९) | ५०/५५ व्या वर्षी पुनर्विलोकन केले आहे का? (लागू असल्यास) | |
| १०) | संबंधित कर्मचाऱ्याला यापूर्वी प्रतिनियुक्ती दिली असल्यास तपशील (पद, ठिकाण व कालावधी) | |
| ११) | संबंधित कर्मचाऱ्याविरुध्द विभागीय चौकशी सुरु अथवा प्रस्तावित आहे काय? | |

५. एकदा निवड झालेल्या कर्मचाऱ्याला त्याचे नांव मागे घेता येणार नाही. तसेच, आपल्या विभागातून सदर पदावर **प्रतिनियुक्तीसाठी जाण्यास कोणीही कर्मचारी इच्छुक नसल्यास तसेही कृपया दिनांक १९-११-२०१९ पर्यंत या विभागास कळविण्यात यावे.**

६. सद्य:स्थितीत शासनाने सरळसेवा भरतीवर निर्बंध घातले असल्याने प्रतिनियुक्तीने रिक्त होणाऱ्या पदावर तत्काळ कर्मचारी उपलब्ध करुन देणे शक्य होणार नाही. तथापि, सरळसेवेने, म.वि.प मार्गाने किंवा पदोन्नतीने सहायक कक्ष अधिकारी उपलब्ध होतील त्या प्रमाणात विभागातील रिक्त पदांच्या टक्केवारीनुसार आपल्या विभागास सहायक कक्ष अधिकारी उपलब्ध करुन देण्यात येतील याची विभागांनी नोंद घ्यावी.

७. सदर पत्राची प्रत महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवरील संदेशफलक या टॅबखाली प्रसिध्द करण्यात येत आहे

८. सदर शासन पत्र महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१९११०४१७३७०९२००७ असा आहे. हे पत्र डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

आपला,

Gajanan Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, serialNumber=54b11b1ccbdc577d71dce3b313c3fef5dc2ad659e360f73b682d6b6fccb8aecf, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2019.11.04 17:40:13 +05'30'

**(ग.भि.गुरव)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत** :- १) उप सचिव (कार्यासन -६), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२

२) सचिव, राज्य माहिती आयोग, मुख्यालय, १३ वा मजला, नविन प्रशासकीय इमारत, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालयसमोर, मुंबई-४०००३२

३), उप सचिव, राज्य माहिती आयोग, कोकण खंडपीठ, कोकण भवन, ५ वा मजला, सी.बी.डी.,-बेलापूर, नवी मुंबई-४००६१४

४) सा.प्र.वि./१४-अ (संग्रहार्थ)